जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख गट-अ संवर्गातील अधिका-यांना पदस्थापना देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : आस्था-२०१६/प्र.क्र.१३७/ई-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ०६ एप्रिल, २०१७

वाचा: १) शासन निर्णय क्र. बदली-२०१५/प्र.क्र.१९०/ई-६ दिनांक १९.१०.२०१५
२) शासन निर्णय क्रमांक : आस्था-२०१६/प्र.क्र.१३७/ई-६, दि.१८ मार्च, २०१७

**शासन आदेश :-**

भूमि अभिलेख विभागातील जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख या संवर्गातील श्री.संजय निरभवने हे वाचा येथील क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये सहयोगि अधिष्ठाता, जे.जे.समुह रुग्णालये, मुंबई येथे प्रतिनियुक्तीने कार्यरत होते. श्री.निरभवने यांची सदर प्रतिनियुक्ती वाचा क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये संपुष्टात आणण्यात आली आहे.

२. प्रतिनियुक्ती संपुष्टात आणल्याने श्री. संजय निरभवने यानां मुळ विभागामध्ये पदस्थापना देण्याच्या अनुषंगाने त्यांच्या पदस्थापनेचा प्रस्ताव भूमि अभिलेख विभागातील गट-अ आणि गट-ब या संवर्गाच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारसी करण्यासाठी शासन निर्णय क्रमांक- आस्था १०१४/प्र.क्र.६६/ई-६, दिनांक १५.१०.२०१६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या नागरी सेवा मंडळ (१) समोर सादर केला असता, सदर नागरी सेवा मंडळ (१) यांनी केलेल्या शिफारशी व शासनाच्या मान्यतेने श्री.निरभवने यांना खालील स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | पदस्थापना केलेले पद | शेरा |
|---|---|---|---|
| ०१ | ०२ | ०३ | ०४ |
| ०१ | श्री. संजय निरभवने, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख | जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, मुंबई उपनगर | श्री. एम.टी.इंगळे (जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, मुंबई उपनगर) यांच्या बदलीचे आदेश वेगळ्याने निर्गमीत करण्यात येतील. |

३. वरील विवरणपत्रामध्ये पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना नवीन पदस्थापित करण्यात आलेल्या पदावर रुजू होण्यासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०४०६१६१५५७३५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.04.06 16:16:49 +05'30'

**( डॉ.संतोष भोगले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१/२,मुंबई, नागपूर
३) सर्व उप संचालक भूमि अभिलेख (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, म.रा.पुणे)
४) संबंधीत अधिकारी (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, म.रा.पुणे)
५) खाजगी सचिव, मा. मंत्री (महसूल), मंत्रालय
६) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (महसूल), मंत्रालय
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवडनस्ती ई-६ कार्यासन, महसूल व वन विभाग.